**महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील**
**<u>अधिका-यांच्या बदल्या/नियुक्त्या.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन आदेश, क्रमांक : मविसे १०/२०११/प्र.क्र. १३५/ आस्था-३**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२**
**दिनांक:- २२ जून, २०११.**

**संदर्भ :-** शासन आदेश क्र.मविसे २५१०/प्र.क्र.२३९/आस्था-२ दि. ६ जून, २०११.

**<u>आदेश</u> :-** सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-यांच्या मान्यतेने आणि पदावधी पूर्ण होण्यापूर्वी बदली प्रस्तावित असलेल्या अधिका-यांच्या बाबतीत कलम ४ (४) व (५) मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिका-याच्या पूर्वमान्यतेने ग्राम विकास व जलसंधारण विभागातील **श्रीमती संगिता लोंढे, तत्कालीन प्राचार्य ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, जालना** यांची संदर्भाधिन आदेशाच्या अनुषंगाने पुन:स्थापनेनंतर या आदेशान्वये **प्राचार्य ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, जालना** या रिक्त पदावर नियुक्ती करण्यात येत आहे.

२. **श्रीमती लोंढे** यांनी त्यांच्या सदर पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२ / २५६७ / २८ / अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. **श्रीमती लोंढे** यांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

४. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०६२२१११२९२२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सरिता बांदेकर-देशमुख )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति

विभागीय आयुक्त, (औरंगाबाद / नाशिक)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (जालना / अहमदनगर)
महालेखापाल- १/२ ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
श्रीमती संगिता लोंढे, तत्कालिन प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, जालना (मुख्य कार्यकारी अधिकारी जि.प. जालना यांचेमार्फत)
मा.मंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
मा.सचिव ( ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक.
कार्यासन क्रमांक : आस्था - २ ग्राम विकास व जलसंधारण विभाग
निवड नस्ती ( कार्यासन क्रमांक :आस्था-३ ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग.